महाराष्ट्र ग्रामिण रस्ते विकास संस्थेअंतर्गत "सेवानिवृत्त उप अभियंता" यांची कंत्राटी तत्वावर नियुक्ती करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.७४/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख **:** १९ एप्रिल, २०२३

**वाचा :**

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०२१/प्र.क्र.१६५/बांध-४, दिनांक ०६.०१.२०२२.
२) **अधीक्षक अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो., नाशिक विभाग, नाशिक यांचे** दि. ०७.१२.२०२२ रोजीचे पत्र
३) **ग्राम विकास विभाग, शासन पत्र क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.३०/बांध-४, दिनांक ३०.०१.२०२३ रोजीचे पत्रे.
४) **अधीक्षक अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो., नाशिक विभाग, नाशिक यांचे** दि. १७.०३.२०२३ रोजीचे पत्र
५) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः** संकिर्ण २७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक १७.१२.२०१६.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यातील न जोडलेल्या वाडया-वस्त्या जोडण्यासाठी व ग्रामीण भागातील दुरावस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी राज्यात मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेचा दुसरा टप्पा दि. ०६ जानेवारी, २०२२ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आला आहे. संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये, अधीक्षक अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो,नाशिक विभाग,नाशिक यांनी केलेल्या विनंतीनुसार कार्यकारी अभियंता,प्र.मं.ग्रा.स.यो.,जळगाव यांनी त्यांच्या कार्यालयात मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या दुसऱ्या टप्प्यात प्राप्त उद्दिष्ट व उपलब्ध अपुरे मनुष्यबळ विचारात घेता, कार्यालयात एक सेवानिवृत्त उप अभियंत्याचे पद कंत्राटी पध्दतीने उपलब्ध करून देण्याबाबत विनंती केली होती. प्रस्तुत विनंतीच्या अनुषंगाने संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये, प्रस्तुत प्रकरणी सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार कार्यवाही करण्याबाबत अधीक्षक अभियंता,प्रमंग्रासयो,नाशिक विभाग,नाशिक यांना प्राधिकृत करण्यात आले होते. त्यानुसार

अधीक्षक अभियंता,प्रमांग्रासयो यांनी प्रस्तुत प्रकरणी वृत्तपत्रात जाहिरात देवून मुलाखती अंती श्री. रविंद्रसिंग भ.परदेशी यांची नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत शिफारस केली आहे.

**आदेश :-**

अधीक्षक अभियंता,प्र.मं.ग्रा.स.यो. यांनी शिफारस केल्यानुसार श्री.रविंद्रसिंग भगतसिंग परदेशी सेवानिवृत्त उप अभियंता यांची, सेवानिवृत्त उप अभियंता म्हणून त्यांच्या नावापुढे रकाना क्र.४ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून ११ महिन्याच्या कालावधीसाठी करार पध्दतीने नेमणूक करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सेवानिवृत्त उप अभियंत्यांचे नाव | कंत्राटी तत्वावर नेमणुक केलेले कार्यालय | नेमणूकीचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.रविंद्रसिंग भगतसिंग परदेशी | कार्यकारी अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.जळगाव | १९/०४/२०२३ |

**२.** सेवानिवृत्त उप अभियंता यांची कंत्राटी पदावरील नियुक्तीच्या कालावधीत कर्तव्ये व जबाबदाऱ्या तसेच अटी व शर्ती संदर्भ क्र. ४ येथील आदेशामध्ये नमूद केल्याप्रमाणे लागू राहतील.

**३.** सेवानिवृत्त उप अभियंता यांचे मासिक परिश्रमिक व भत्ते सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २७१५ /प्र.क्र.१००/१३, दि. १७/१२/२०१६ मधील तरतूदी प्रमाणे देय राहतील.

**४.** या प्रकरणी येणारा खर्च मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे (सीआरसी- ५०५४ ५१५३) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

**५.** हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण २७१५/प्र.क्र. १००/१३, दि. ०८.०१.२०१६ व संकीर्ण २७१५ /प्र.क्र.१००/१३, दि. १७/१२/२०१६ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०४१९१५४१५०९४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.04.19 17:12:45 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद.
२) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/( लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई.
३) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/( लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४) मा.अ.मु.स.(ग्रा.वि. व पं.रा.), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
५) मा.सचिव (मु.मंग्रा.स.यो.), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
६) मा मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव.
७) मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो), पुणे.
८) अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो) म.ग्रा.र.वि.सं., नाशिक विभाग,नाशिक.
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११) कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो) म.ग्रा.र.वि.सं., जळगाव.
१२) राज्य गुणवत्ता समन्वयक, अण्णासाहेब मगर बिल्डिंग, मार्केट यार्ड, गुलटेकडी, गेट नं.२, पुणे-३७.
१३) सेवानिवृत्त उप अभियंता श्री. रविंद्रसिंग परदेशी (ई-मेल द्वारे).
१४) कक्ष अधिकारी (आस्थापना १), ग्रा.वि.वि., मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती, (कार्यासन बांधकाम-४) ग्रा.वि.वि. बांधकाम भवन, मुंबई.